**क्षमताबांधणी व पूर्वतयारीसाठी प्राप्त होणाऱ्या निधीतून शोध व बचाव कार्याकरीता ARMY, NDRF व SDRF या प्रतिसाद यंत्रणेस साहित्य खरेदी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**आपत्ती व्यवस्थापन प्रभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. ड्रोनख-२०२४/प्र.क्र.२६/मंनिक-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक :- ९ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :** १) क्र.D-III-३/OPS/५BN NDRF/२०२३, कमांडंट, ०५th BN NDRF यांचे दि.०८ एप्रिल २०२३ रोजीचे पत्र
२) PC-१९५०/R/GS (Ops), Lt Col GSO-१ (Ops) for GOC यांचे दि.३० एप्रिल २०२४ चे पत्र
३) दि.०४ जुलै , २०२४ रोजीच्या राज्य कार्यकारी समिती ( SEC ) च्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:**

राज्यात उद्भवणाऱ्या विविध नैसर्गिक व मानवनिर्मित आपत्तींना प्रतिसाद देण्याकरीता भारतीय स्थल सेना (Indian Army), राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दल (NDRF), राज्य आपत्ती प्रतिसाद दल (SDRF), महाराष्ट्र अग्निशमन सेवा इत्यादी प्रतिसाद यंत्रणा कार्यरत आहेत. १५ व्या वित्त आयोगाच्या मार्गदर्शक सूचनेनूसार क्षमताबांधणी व पूर्वतयारीसाठी निधीची तरतूद करण्यात आलेली आहे. या निधीमधून प्रतिसाद यंत्रणांना शोध व बचाव ( Search and Rescue ) कार्यासाठी आवश्यक साहित्य/ यंत्रणा/ उपकरणे उपलब्ध करून देण्यात येतात.

२. संदर्भाधीन क्र. १) व २) अन्वये अनुक्रमे राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दल ( NDRF ) व भारतीय स्थल सेना ( Indian Army ) यांजकडून Surveillance व Payload ड्रोन उपलब्ध करुन देण्याची शासनास विनंती करण्यात आली होती. त्यानुसार सदर साहित्य/ उपकरणे विभागामार्फत खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

भारतीय स्थल सेना ( Indian Army ), राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दल (NDRF) व राज्य आपत्ती प्रतिसाद दल (SDRF) यांच्याकडून संदर्भाधीन क्रमांक १) व २) अन्वये शोध व बचाव कार्यासाठी मागणी करण्यात आलेल्या खालील तक्त्यात नमूद एकूण २१ ड्रोन विभागाद्वारे खरेदी करण्यास व सदर साहित्याच्या खरेदीसाठी होणारा रु.१०.२० कोटी इतका खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

( किंमत रुपयामध्ये )

| अ.क्र. | प्रतिसाद यंत्रणा | Surveillance | किंमत ( प्रति नग रू.३८ लक्ष ) | Pay loads | किंमत ( प्रति नग रू.६६ लक्ष ) |
|---|---|---|---|---|---|
| १ | ARMY | ५ | रू.२.२८ कोटी | - | - |
| २ | NDRF | ४ | रू.१.५२ कोटी | ४ | रू.२.६४ कोटी |
| ३ | SDRF | ४ | रू.१.५२ कोटी | ४ | रू.२.६४ कोटी |
| | | १३ | रू.४.९४ कोटी | ८ | रू.५.२८ कोटी |
| एकूण रू. ४.९४ कोटी + रू. ५.२८ कोटी = रू. १०.२२ कोटी ( रूपये दहा कोटी बावीस लक्ष फक्त ) | | | | | |

२. याबाबीवर होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधानशीर्ष, (२२४५) (९१)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०१) पूर्व तयारी व क्षमता बांधणी (वित्त आयोग) (अनिवार्य) (२२४५ ४१८८) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली सन २०२४ - २५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२९४/२०२४/व्यय-९, दि. २५ जुलै, २०२४ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८०९१८१४१९६३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=028BA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.08.09 18:31:21 +05'30'

**( हितेंद्र दुफारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
२) महालेखापाल, लेखा परिक्षा, १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४) लेफ्टनंट कर्नल, भारतीय स्थल सेना, महाराष्ट्र, गुजरात व गोवा क्षेत्र मुख्यालय, पिन - ९०८८०६.
५) कमांडट, ५th BN NDRF, सदुंबरे, तहसील - मावळ, जिल्हा - पुणे, ४१२१०९.
६) कमांडट, SDRF, नागपूर

७) प्रधान सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) संचालक, आपत्ती व्यवस्थापन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) सह सचिव व वित्तीय सल्लागार, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई .
१०) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग (६-आव्यप्र), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई .
११) सह सचिव (व्यय-९/ अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती (मंनिक-२/आव्यप्र-१)